सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर जालना नगरपरिषदेच्या पाणी पुरवठा प्रकल्पासाठी राज्य शासनाच्या पहिल्या हप्त्याचे अनुदान वितरण.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः नगरो-२०१५/प्र.क्र. २८३/नवि-३३**

मंत्रालय, मुंबई-४०००३२,

दिनांक- ०६ नोव्हेंबर, २०१५.

वाचा-

१) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र.नगरो-२०१४/प्र.क्र.११९/नवि-३३, दि. २१/०८/२०१४.

२) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बैठक-२०१५/प्र.क्र.१९४(२)/नवि-३३, दि. ०६ सप्टेंबर, २०१५.

३) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बैठक-२०१५/प्र.क्र.१७ (२)/नवि-३३, दि. १० जुलै, २०१५.

४) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बैठक-२०१५/प्र.क्र.१७/नवि-३३, दि.१३ ऑक्टोबर, २०१५.

प्रस्तावना-

राज्यातील वाढते नागरीकरण लक्षात घेऊन नागरी भागांचा दिर्घकालीन व सुनियोजित विकास करण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन क्रमांक ०१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियान राज्यात राबविण्यात आहे.

०२. जालना नगरपरिषदेच्या पाणी पुरवठा प्रकल्पास संदर्भाधीन क्र. ०३ च्या शासन निर्णयान्वये रद्द केलेली प्रशासकिय मान्यता संदर्भाधीन क्रमांक ०४ च्या शासन निर्णयान्वये कायम करण्यात आली आहे. सदर प्रशासकिय मान्यतेच्या अधीन राहून महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानाअंतर्गत मंजूर जालना नगरपरिषदेच्या पाणी पूरवठा प्रकल्पासाठी प्रथम हप्त्याचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानाअंतर्गत मंजूर जालना नगरपरिषदेच्या पाणी पुरवठा प्रकल्पास खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे राज्य शासनामार्फत अनुज्ञेय असलेल्या पहिल्या हप्त्याच्या रकमेचा खाली दर्शविल्यानुसार निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रूपये कोटीत)

| अ. क्र | स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव व वर्गवारी | योजनेचे स्वरूप | एकूण मंजूर प्रकल्प किंमत (१०० टक्के) | संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ७५ टक्के) | संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या २५ टक्के) | संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय हप्ता | संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदानापैकी सध्या वितरीत करावयाचे अनुदान | राज्य शासनाने सध्या वितरीत करावयाचा हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | | ९. | १०. |
| १ | जालना नगरपरिषद अ वर्ग | पाणी पूरवठा प्रकल्प | १२९.०४६० | ९६.७८४५ | ३२.२६१५ | ४८.३९२२ | ४८.३९२२ | पहिला |

२. उपरोक्त नमूद केल्यानुसार निधीचे वितरण करण्यासाठी जिल्हाधिकारी, जालना यांना नियंत्रण अधिकारी व जिल्हाप्रशासन अधिकारी, जालना यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. जिल्हाप्रशासन अधिकारी, जालना यांनी सदर अनुदान रूपये अठ्ठेचाळीस कोटी, एकोणचाळीस लक्ष, बावीस हजार (रूपये ४८,३९,२२,०००) इतक्या रकमेचा धनादेश मुख्याधिकारी, जालना नगरपरिषद (Chief Officer, Jalna) यांच्या नावे काढून तो मुख्याधिकारी, जालना नगरपरिषद यांच्याकडे सुपूर्द करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

३. उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याच्या दृष्टीने खालील अटींचे पालन करणे जालना नगरपरिषदेस बंधनकारक राहील.

(अ) सदर निधीचा वापर वर नमूद प्रकल्पाकरीताच करणे आवश्यक राहील. सदर निधीचा विनियोग प्रकल्पाव्यतिरिक्त इतर बाबींवर केल्यास सदरहू खर्चही आर्थिक अनियमितता मानली जाईल.

ब) सदर प्रकल्पाकरिता मंजूर किंमतीपेक्षा निविदा स्वीकृतीची किंमत अधिक असल्यास त्याचे दायित्व जालना नगरपरिषदेचे राहील.

(क) प्रकल्प किंमतीपैकी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा स्वहिस्सा उभारण्याकरीता संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने विहीत वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतले असल्यास त्या कर्जाच्या रकमेची परतफेड नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने प्रामुख्याने वित्त आयोगातील प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्याचे नियोजन करावे. सदर स्रोतातून संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस प्राप्त होणाऱ्या रकमा, प्रकल्पांतर्गत घेतलेल्या कर्जापोटी शासनाने परस्पर वळती करून संबंधीत वित्तीय संस्थेस कर्जाच्या परतफेडीपोटी वर्ग करण्यास संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची संमती असल्याचा ठराव नगरपरिषदेने करून त्याची प्रत राज्यस्तरीय नोडल यंत्रणेमार्फत शासनास सादर करावी.

(ड) राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अनुदानाच्या प्रमाणात निधी उभा करून प्रकल्प कार्यावर खर्च करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहिल. अशा प्रकारे खर्च करून नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर शासनामार्फत पुढील हप्त्याचा निधी वितरीत करण्याबाबत उचित कार्यवाही केली जाईल.

४. या योजनेअंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणी तसेच सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा अहवाल नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने वेळोवेळी राज्यस्तरीय नोडल यंत्रणेमार्फत राज्य शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णयान्वये प्राप्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र उपलब्ध करून संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी या नात्याने जिल्हाधिकारी, जालना यांची राहिल.

६. सदर प्रयोजनात होणा-या रुपये अठ्ठेचाळीस कोटी, एकोणचाळीस लक्ष, बावीस हजार फक्त (रुपये ४८,३९,२२,०००/) इतक्या रक्कमेचा खर्च हा "नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (६१) महाराष्ट्र नगरोत्थान महाभियानांतर्गत नगरपरिषदांसाठी सहाय्यक अनुदान (२२१७ ८१२८) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखा शिर्षाखालील सन २०१५-१६ या वर्षीच्या मंजूर आर्थिक तरतुदीमधून भागविण्यात यावा.

७. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/ प्र.क्र.८५/ अर्थ-३, दिनांक १७/०४/२०१५ मधील नमूद सर्व अटींची पूर्तता होत असल्याबाबत विभागाने तपासून घेऊन त्याअनुषंगाने विभागाच्या स्तरावरून निधी वितरीत करण्यास देण्यात आलेल्या अधिकाराच्या अनुषंगाने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०९१४१७००७७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nilesh Potdar

Digitally signed by Nilesh Potdar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nilesh Potdar
Date: 2015.11.09 14:21:04 +05'30'

**( निलेश पोतदार )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री कार्यालयाचे सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. मा.विरोधी पक्ष नेते,महाराष्ट्र विधानसभा याचे खाजगी सचिव
३. मा.विरोधी पक्ष नेते,महाराष्ट्र विधानपरिषद याचे खाजगी सचिव
४. मा.मंत्री सर्व यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
५. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई-३२
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२.अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१३.आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, तथा नोडल एजन्सी, वरळी, मुंबई
१४.उप सचिव (नवि-५), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी(नवि-५),नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
१७. जिल्हाधिकारी, जालना
१८. जिल्हा प्रशासन अधिकारी, जालना
१९. मुख्याधिकारी,जालना नगरपरिषद
२०.जिल्हा कोषागार अधिकारी, जालना
२१. कक्ष अधिकारी (नवि-०३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. कक्ष अधिकारी (नवि-०४), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती, नवि-३३.